**महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक/ पोलीस हवालदार / पोलीस नाईक व पोलीस शिपाई यांच्याकरिता पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा (मुख्य) परीक्षा - २००९**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक - पीएसबी-०३०९/प्र.क्र.९८१/पोल-५अ**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक २ मे, २०११**

**संदर्भ :- शासन परिपत्रक क्रमांक- पीएसबी-०३०९/प्र.क्र.९८१/पोल-५अ**
**दिनांक २ डिसेंबर, २०१०**

**शासन परिपत्रक** :- महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील **पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी मर्यादित विभागीय स्पर्धा (मुख्य) परीक्षा - २००९** महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत **दिनांक १९ मे, २०११** रोजी मुंबई, औरंगाबाद, नागपूर व पुणे या चार जिल्हाकेंद्रावर घेण्यात येणार आहे. परीक्षेचा कार्यक्रम, आरक्षित पदांचा व निवडपध्दतीचा तपशील, सोबत जोडलेल्या **परिशिष्ट - अ -** मध्ये नमूद केला आहे. प्रस्तुत परिपत्रक सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक, पोलीस हवालदार, पोलीस नाईक व पोलीस शिपाई या संवर्गातील सर्व संबंधित कर्मचा-यांच्या **(रजेवर/ प्रतिनियुक्तीवर असणा-या कर्मचा-यांसह)** निदर्शनांस आणावे.

हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक .२०११०५०३१७०८४३४००१... असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

**( सु.ग.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग**

प्रति,

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
२) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४) संचालक, अँन्टी करप्शन ब्युरो, मुंबई.
५) अप्पर पोलीस महासंचालक, गुन्हा अन्वेषण विभाग (गुन्हे), पुणे
६) आयुक्त, गुन्हा अन्वेषण विभाग (गुप्तवार्ता), मुंबई.
७) विशेष पोलीस महानिरीक्षक, (प्रशिक्षण व खास पथके), मुंबई.
८) विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, मुंबई.
९) सर्व पोलीस उपमहानिरीक्षक.
१०) सर्व पोलीस अधीक्षक.
११) सर्व पोलीस आयुक्त, (मुंबई वगळून).

## परिशिष्ट - अ

**शासन परिपत्रक क्र.पीएसबी-०३०९-प्र.क्र.९८१/पोल ५-अ, दिनांक २ डिसेंबर, २०१० नुसार आयोगातर्फे दिनांक २३ जानेवारी, २०११** रोजी घेण्यात आलेल्या **पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा (पूर्व) परीक्षा - २००९ च्या निकालाच्या आधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी अर्हतापात्र ठरलेल्या** उमेदवारांची **मुख्य परीक्षा महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत दिनांक १९ मे, २०११** रोजी औरंगाबाद, मुंबई , नागपूर व पुणे या ठिकाणी घेण्यात येणार आहे. सदर परीक्षा खालील तीन टप्प्यांत घेण्यात येईल :-

(१ ) लेखी परीक्षा :- एकूण ३०० गुण

(२ ) शारीरिक चाचणी :- एकूण १०० गुण.

(३) मुलाखत :- एकूण ५० गुण

**२. परीक्षा शुल्क :**

**२.१** अमागास - ४१०/- **२.२** मागासवर्गीय - २१०/-

**२.३** सदर शुल्क ऑनलाईन अर्जांची नोंदणी केल्यावर प्राप्त होणा-या विहित चलनाद्वारे भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेमध्ये कार्यालयीन वेळेत रोखीने भरावे लागेल.

**२.४** बँकेमध्ये रक्कम भरल्यानंतर बँकेकडून चलनांवर उपलब्ध करुन देण्यात आलेल्या Transaction ID ची नोंद पुन्हा ऑनलाईन पद्धतीने अचूकरित्या केल्याशिवाय अर्ज भरण्याची प्रक्रिया पूर्ण होणार नाही.

**३. मुख्य परीक्षेस प्रवेश :-**

**३.१** पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा (पूर्व) परीक्षा - २००९ च्या निकालाआधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या आणि शासनपरिपत्रकातील शैक्षणिक अर्हता व अन्य अटींची पूर्तता करणा-या उमेदवारास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येईल.

**३.२** पूर्व परीक्षेच्या निकालाच्या आधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांनी आयोगाच्या www.mpsconline.gov.in या वेबसाईटवर स्वतःच्या युजर आयडी व पासवर्डद्वारे प्रवेश (Login) केल्यानंतर Apply Exam / Post या बटणावर क्लिक करावे. त्यानंतर पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा (मुख्य) परीक्षा - २००९ वर Apply केल्यावर उमेदवारास त्याच्या पसंतीचे परीक्षा केंद्र (औरंगाबाद, मुंबई, नागपूर, पुणे) निवडावे लागेल. परीक्षा केंद्र निवडल्यानंतर तसेच दिनांक व ठिकाण नमूद केल्यावर Submit to MPSC वर क्लिक करुन आयोगास माहिती सादर करावी.

**३.३** वरीलप्रमाणे आयोगास माहिती सादर केल्यानंतर विहित परीक्षा शुल्काचा भरणा करण्यासाठी Print Challan या बटनावर क्लिक करावे व चलनाची प्रत घ्यावी. सदर चलनावर नमूद केल्याप्रमाणे आवश्यक परीक्षा शुल्क चलनासह भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत बँकेच्या कार्यालयीन वेळेत रोखपालाकडे सादर करावे व बँकेकडून त्याच वेळी चलनाची प्रत घ्यावी.

**३.४** बँकेमध्ये विहित परीक्षा शुल्काचा चलनाद्वारे भरणा केल्यानंतर चलनावर प्राप्त झालेल्या Transaction ID ची नोंद खालीलप्रमाणे करावी :-

**(१)** बँकेमध्ये रकमेचा भरणा केल्यावर शासकीय कार्यालयीन कामकाजाच्या दोन दिवसानंतर स्वतःच्या युजर आयडी व पासवर्डद्वारे प्रवेश(Login) करुन Apply Exam / Post या बटणावर क्लिक करावे व Update Transaction ID या बटणावर क्लिक करुन बँकेकडून प्राप्त झालेला Transaction ID अचूकपणे नोंदवावा. बँकेकडून प्राप्त झालेल्या Transaction ID ची नोंद अचूकपणे करण्यात आली असेल तरच उमेदवार मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरेल व पुढील प्रक्रिया करता येईल. अन्यथा पुढील कोणतीही कार्यवाही होऊ शकणार नाही.

**(२)** Transaction ID ची नोंद अचूकपणे केल्यानंतर व नोंदविलेला Trasaction ID वैध असल्यास उमेदवाराला संबंधित जिल्हाकेंद्रावरील आयोगाने निश्चित केलेले उपकेंद्र निवडावे लागेल.

**(३)** उपकेंद्र निवडल्यानंतर उमेदवारास त्याच्या प्रवेशप्रमाणपत्राची प्रत प्रोफाईलद्वारे उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच, त्याच्या नोंदणीकृत ई-मेल वर प्रवेशपत्र प्राप्त होईल. सदर प्रवेशपत्राची प्रत घ्यावी.

**(४)** परीक्षेच्या वेळी उमेदवाराने प्रवेशपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

**(५)** प्रस्तुत परीक्षेच्या प्रवेशासाठी ऑनलाईन पद्धतीने माहिती सादर करणा-या उमेदवारांना अर्जाची प्रत अथवा कोणत्याही प्रकारची कागदपत्रे अथवा ऑनलाईन अर्ज प्रणालीमध्ये असलेल्या शपथपत्राव्यतिरिक्त कोणतेही वेगळे शपथपत्र/ॲफिडेव्हीट आयोगाकडे पाठविण्याची आवश्यकता नाही.

**४.** विहित पद्धतीने परीक्षा केंद्र निवडून परीक्षा शुल्क भरण्यासाठी चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही **दिनांक १० मे, २०११** रोजी २३.५९ वाजेपर्यंत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल. चलनाद्वारे शुल्क भारतीय स्टेट बँकेमध्ये **दिनांक ११ मे,२०११ पर्यंत बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे आवश्यक राहील.**

**५.** चलनाद्वारे शुल्क भारतीय स्टेट बँकेमध्ये भरल्यानंतर बँकेकडून प्राप्त होणारा Transaction ID **दिनांक १३ मे, २०११** रोजी **२३.५९** वाजेपर्यंत अचूकपणे नोंदविणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.

**६.** Transaction ID ची नोंद अचूकरित्या,विहित पद्धतीने व विहित कालावधीत न करणाऱ्या उमेदवारास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येणार नाही.

**७.** सदर परिपत्रक आयोगाच्या **www.mpsc.gov.in** व **www.mpsconline.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

**८.** उमेदवारांनी वरीलप्रमाणे कार्यवाही पूर्ण केल्यानंतर **आपल्या विभाग / कार्यालय प्रमुखांना कळविणे आवश्यक असून, उमेदवाराचा अर्ज विचारात घेण्यास विभाग / कार्यालय प्रमुखांचा कोणताही आक्षेप असल्यास तसे विभाग / कार्यालय प्रमुखांनी दिनांक १८ मे, २०११ पर्यंत आयोगास कळविणे आवश्यक आहे. मात्र अर्ज विचारात घेण्यास हरकत नसल्यास आयोगास तसे कळविण्याची आवश्यकता नाही.**

* * * * *